केंद्र शासन पुरस्कृत योजनासाठी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय दक्षता व संनियंत्रण समितीवर सदस्यांची नियुक्ती करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
शासन निर्णय क्रमांक-जिग्राप्र-२००८/प्र.क्र ७४ /योजना-५
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दिनांक- १२ जून, २००९

**वाचा :-**

१) शासन निर्णय , ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक जिग्राप्र-२००४/प्र.क्र.६०६/यो-५, दिनांक २९ जानेवारी, २००५.

२) केंद्रिय ग्रामीण विकास मंत्रालय, आदेश क्रमांक- Q-13018/79/2007-AI (RD)- दिनांक १६ मे २००८.

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत योजनांची अंमलबजावणी, प्रगती व संनियंत्रण यांचा आढावा घेणे तसेच धोरणात्मक बाबी करिता मार्गदर्शन करण्यांकरिता उपरोल्लेखीत दिनांक १६ मे, २००८ च्या आदेशान्वये **राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय** दक्षता व संनियंत्रण समितीवर केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालयाच्या तसेच राज्य शासनाच्या महिला व बाल विकास विभागाच्या प्रतिनीधीची नियुक्ती करण्याबाबत तसेच सदर समितीने महिला व बाल विकास मंत्रालयाच्या विविध कार्यक्रम / योजनांचे सनियंत्रण करण्याबाबत केंद्र शासनाने कळविले आहे. केंद्र शासनाने केंद्रपुरस्कृत कार्यक्रमांच्या संनियंत्रणासाठी यापूर्वी शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक जिग्राप्र-२००४/प्र.क्र.६०६/योजना-५, दिनांक २९ जानेवारी, २००५.अन्वये नियुक्त केलेल्या पुनर्रचीत समितीमध्ये महिला व बाल विकास मंत्रालयाच्या अखत्यारितील महिला व बाल विकासा संबधीच्या कार्यक्रमाची अंमलबजावणी राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय दक्षता व संनियंत्रण समितीमार्फत करण्यासाठी सदर समितीवर केंद्र शासनाच्या व राज्य शासनाच्या अनुक्रमे महिला व बाल विकास मंत्रालयाचे तसेच महिला व बाल विकास विभागाचे प्रतिनीधी सदस्य म्हणून नियुक्त करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्यानुसार राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय दक्षता व संनियंत्रण समित्यांवर सदस्यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधिन अ.क्र. २ येथील दिनांक १६ मे,२००८ च्या आदेशास अनुसरुन राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय दक्षता व संनियंत्रण समितीवर पुढील प्रमाणे केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालय तसेच राज्य शासनाच्या जिल्हा महिला व बाल विकास विभागाच्या प्रतिनिधीस सदस्य म्हणून नियुक्त करण्यात येत आहे.

अ ) **राज्यस्तरीय दक्षता व सनियंत्रण समिती**

| | |
|---|---|
| १) केंद्र शासनाच्या महिला व बाल विकास मंत्रालयाचा एक प्रतिनिधी. | सदस्य |
| २) आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे. | सदस्य |
| ३) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना , नवी मुंबई | सदस्य |

ब ) **जिल्हा स्तरीय दक्षता व संनियंत्रण समिती -**

| | |
|---|---|
| १) जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी. | सदस्य |

**समितीची कार्ये** - सोबत जोडलेल्या जोडपत्र-'अ' नुसार बालकल्याण विषयक योजनांचे सनियंत्रण राज्यस्तरीय व जिल्हास्तरीय दक्षता व संनियंत्रण समिती करेल.

संदर्भाधिन अ.क्र.१ येथील दिनांक २९ जानेवारी, २००५ च्या शासन निर्णयातील इतर अटी व शर्ती कायम राहतील. सदर शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग, महाराष्ट्र शासन यांच्या सहमतीने निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर www.maharashtra.gov.in वर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक सांकेतांक क्र. २००९०६०५१७०३२६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अविनाश
**( अविनाश सुभेदार)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री, ग्राम विकास यांचे स्वीय सहाय्यक,
मा.मंत्री, जलसंधारण यांचे स्वीय सहाय्यक,
मा.मंत्री (सर्व)
मा.राज्यमंत्री (सर्व)
मा.राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे स्वीय सहाय्यक,
मा.राज्यमंत्री, जलसंधारण यांचे स्वीय सहाय्यक,
मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र शासन,
सर्व जिल्हयातील संसद सदस्य/विधान सभा/विधान परिषद सदस्य,
अध्यक्ष जिल्हा परिषद (सर्व )
सभापती पंचायत समिती (सर्व )
सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार नवी दिल्ली,
सचिव,महिला व बाल विकास विभाग मंत्रालय,मुंबई.
सर्व अप्पर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव , मंत्रालय,मुंबई
संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,मुंबई
महालेखापाल, मुंबई / नागपूर
संचालक,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
संचालक, लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महात्माफुले मागासवर्गीय विकास महामंडळ,मुंबई
व्यवस्थापकीय संचालक,महिला आर्थिक विकास महामंडळ. मुंबई
व्यवस्थापकीय संचालक आदिवासी विकास महामंडळ,नाशिक.
व्यवस्थापकीय संचालक, खादी ग्रामोद्योग आयोग, ४ था मजला, रॉयल इन्शुरन्स बिल्डींग, जे. टी. रोड, चर्चगेट, मुंबई.
विभागीय आयुक्त (सर्व) / जिल्हाधिकारी (सर्व )
मुख्य कार्यकारी अधिकारी , जिल्हा परिषद (सर्व) /उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण ) जिल्हा परिषद (सर्व)
प्रकल्प संचालक जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (सर्व)
सर्व मंत्रालयीन विभाग,
कार्यासन अधिकारी,समन्वय कक्ष (२ प्रती) ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई
सर्व अवर सचिव / कक्ष अधिकारी, ग्राम विकास व जलसंधारण विभाग. मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती का. क्र. योजना-५

## जोडपत्र - अ

**ब - बालकांच्या योजना**

| अ.क्रं. | योजना | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|
| १ | एकात्मिक बाल विकास योजना | राज्य / केंद्रशासित प्रदेश |
| २ | राजीव गांधी राष्ट्रीय कामकरी लोंकांच्या मुलांकरीता सार्वजनिक संगोपन केंद्र योजना | अशासकिय संस्था |
| ३ | धनलक्ष्मी (सशर्त निधी हस्तांतरण योजना) (पथदर्शी योजना ) | अशासकिय संस्था |
| ४ | रस्त्यावर भटकणा-या मुलांसाठी एकात्मिक योजना ( जेव्हा एकात्मिक बाल संरक्षण योजना सुरु होईल तेव्हा विलीन करणे ) | राज्य / केंद्रशासित प्रदेश,स्थानिक स्वराज्य संस्था , ऐच्छिक संस्था |
| ५ | कामकरी मुलांसाठी कल्याण योजना | अशासकिय संस्था |

एर्न- ८००-२